**औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नाशिक, जि. नाशिक.**
**संस्थेच्या कार्यशाळा क्र. १, २, ३ या विभागातील नवीन विद्युतीकरणाचे कामांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.. (रुपये ६९,७६,८१९/-)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रशामा-२८११/२०१४/प्र.क्र. ९५/व्यशि-२,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ६ जुलै, २०१५.

वाचावे :-

प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : १५/दर्जावाढमंजूरी (नाशिक)/२०१४/शा-८४/०२, दिनांक ०१.०१.२०१५.

**प्रस्तावना :-**

प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी उक्त पत्रान्वये "औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक"या संस्थेची इमारत ५० वर्ष जूनी असून, तेथील सर्व विभागातील इलेक्ट्रीकल वायरिंग जूनी झाली असल्याने आणि मेन स्वीच तुटलेले व वारंवार शॉर्टसर्कीट होत असल्याचे कळविले आहे. तद्नुषंगाने, सार्वजनिक बांधकाम विभाग, विद्युत विभाग, नाशिक यांनी कार्यशाळा क्रमांक १, २ व ३ मधील वायरींग नुतनीकरणासाठी रुपये ६९,७६,८१९/- (रुपये एकोण सत्तर लक्ष शहात्तर हजार आठशे एकोणवीस फक्त) इतक्या किंमतीच्या सादर केलेल्या अंदाजपत्रकाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत शासनास विनंती केली आहे. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**(रुपये)**

| अ.क्र. | कामांचा तपशील | अंदाजित रक्कम |
|---|---|---|
| **(अ)** | **कार्यशाळा क्रमांक - ०१.** | |
| १ | मशिनीष्ठ अ, ब, मशिनीष्ठ ग्राईन्डर, मॅक्याट्रॉनिक्स, विद्युतीकरण करणे. | ४,९७,१६०/- |
| २ | टर्नर अ, ब, क, ड स्टोअर विभाग, प्रोशिजन लॅबचे विद्युतीकरण करणे. | ४,९६,५२६/- |
| ३ | ऑपरेटर ॲडव्हॉन्स मशिन टुल्स, एमएमटीएम, स्वछतागृहाचे विद्युतीकरण. | ४,९५,८९२/- |
| ४ | वर्कशॉपमध्ये डाव्या बाजुस फॅन, लाईट फिटींग बसविणे. | ४,९९,०२५/- |
| ५ | वर्कशॉपमध्ये उजव्या बाजूस फॅन, लाईट फिटींग बसविणे. | ४,९९,०२५/- |
| | **एकूण रुपये....** | **२४,८७,६२८/-** |
| **(ब)** | **कार्यशाळा क्रमांक - ०२.** | |
| ६ | वेल्डर, फिटर, वायरमन, विजतंत्री विभागाचे विद्युतीकरण करणे. | ४,९७,७९४/- |
| ७ | शिटमेटल, डिझेल मेकॅनिक, आरएसीचे विद्युतीकरण करणे. | ४,९८,४२८/- |
| ८ | प्लंबर, पॅपऑरेटर कम मेकॅनिक, इन्स्ट्युमेंट मेकॅनिक, कारपेंटर, फौंड्रीमन, मेसन व स्वच्छतागृहाचे विद्युतीकरण करणे. | ४,९९,०६२/ |
| ९ | वर्कशॉपमध्ये उजव्या बाजुस फॅन, लाईट फिटींग बसविणे. | ४,९९,०२५/- |
| १० | वर्कशॉपमध्ये डाव्या बाजूस फॅन, लाईट फिटींग बसविणे. | ४,९९,०२५/- |
| | **एकूण रुपये....** | **२४,९३,३३४/-** |

| | | |
|---|---|---|
| **(क)** | **कार्यशाळा क्रमांक - ०३.** | |
| ११ | मोटार मेकॅनिक, पीपीओ, पेंटर सिव्हील ड्रॉसमनचे विद्युतीकरण करणे. | ४,९९,६९६/- |
| १२ | ड्रॉसमन मेकॅनिक टिडीएम व स्वच्छतागृहाचे विद्युतीकरण करणे. | ४,९९८,१११/- |
| १३ | वर्कशॉपमध्ये उजव्या बाजूस फॅन, लाईट फिटींग बसविणे. | ४,९९,०२५/- |
| १४ | वर्कशॉपमध्ये डाव्या बाजूस फॅन, लाईट फिटींग बसविणे. | ४,९९,०२५/- |
| | **एकूण रुपये....** | **१९,९५,८५७/-** |
| | **अंदाजित एकूण रुपये....** | **६९,७६,८१९/-** |

संचालनालयाने विषयाधीन प्रयोजनार्थ नमूद केलेल्या “औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक”या संस्थेतील कार्यशाळांच्या नवीन विद्युतीकरणाच्या कामांना रुपये ६९,७६,८१९/- (रुपये एकोण सत्तर लक्ष शहात्तर हजार आठशे एकोणवीस फक्त) प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालनालयाने “औद्योगिक प्रशिक्षण संस्था नाशिक”या संस्थेतील तीन कार्यशाळांच्या नवीन विद्युतीकरणाच्या कामांना रुपये ६९,७६,८१९/- (रुपये एकोण सत्तर लक्ष शहात्तर हजार आठशे एकोणवीस फक्त) इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागास सादर केल्यानंतर, सदर विभागाने प्रस्तावाच्या किंमतीवर छाननी-अंती सहमती दिलेल्या किंमतीचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**(रुपये)**

| Sr. No | Particulars | **प्रस्तावाची किंमत** | **छाननी अंती किंमत** |
|---|---|---|---|
| १ | Work Shop No. १ | 24,87,628/- | 24,87,628/- |
| २ | Work Shop No. २ | 24,93,334/- | 24,93,334/- |
| ३ | Work Shop No. ३ | 19,95,857/- | 19,95,857/- |
| | Total.. | **69,76,819/-** | **69,76,819/-** |

२. सार्वजनिक बांधकाम विभागाने वरील तीन कार्यशाळांच्या नवीन विद्युतीकरणाच्या कामांना छाननी-अंती रुपये ६९,७६,८१९/- (रुपये एकोण सत्तर लक्ष शहात्तर हजार आठशे एकोणवीस फक्त) इतक्या किंमतीस दिलेली प्रशासकीय मान्यता ही खालील अटी/शर्तींच्या अधीन राहून दिली आहे :-

(१) उपरोक्त कार्यशाळेतील नवीन विद्युतीकरणाच्या कामांची सर्व अंदाजपत्रके शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उप विभाग, नाशिक विभाग क्रमांक-१, यांनी तयार केली असून उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उप विभाग, नाशिक, कार्यकारी अभियंता, विद्युत विभाग, नाशिक यांनी साक्षांकित केली आहेत.

(२) प्रस्तावामध्ये **वर्कशॉप क्रमांक-१ मध्ये** मशिनिष्ट अ, ब, मशिनिष्ट ग्रॉईडर, मॅक्यॉट्रानिक्स, विद्युतीकरण करणे, ऑपरेटर ॲडव्हान्स मशिन्स टूल्स, वर्कशॉपमध्ये फॅन, लाईट फिटींग, **वर्कशॉप क्रमांक-२ मध्ये** वेल्डर, फिटर, वायरमेन, वीजतंत्री विभागाचे विद्युतीकरण करणे, प्लंबर पंप ऑपरेटर कम मेकॅनीक व इतर विद्युतीकरणाची कामे, **वर्कशॉप क्रमांक-३ मध्ये** मोटर मेकॅनिक, पीपीओ, पेंटर सिव्हील डॉसमनचे

विद्युतीकरण करणे, ड्रासमन मेकॅनिक, पीपीओ व पेंटर सिव्हील ड्राफ्टसमनचे विद्युतीकरण करणे, फॅन व लाईट फिटींग करणे इत्यादि कामे मंजूर आहेत. सदर कामास संबंधित विभागाची मान्यता धरण्यात येत आहे. अंदाजपत्रकामध्ये इतर कोणतेही चार्जेस अंतर्भुत नाहीत.

(३) अंदाजपत्रके सन २०१३-१४ मधील नाशिक जिल्हयाच्या दरसूचीवर आधारीत आहे. तसेच, ढोबळ स्वरुपात धारण करण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

४. यासाठी येणारा खर्च, "४२५०, इतर सामाजिक व सामूहिक सेवांवरील भांडवली खर्च, ५३, मोठी बांधकामे, (०३) (०२) जून्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जा वाढ करणे (४२५० २४०२)" या लेखाशार्षाखालील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ११२/इमा-३, दिनांक २९.०५.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक : २०१५०७०६१४०७५७२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Vilas Ramchandra Wanjari

Digitally signed by Vilas Ramchandra Wanjari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramchandra Wanjari
Date: 2015.07.06 14:10:13 +05'30'

**( विलास रा. वंजारी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, नाशिक.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सातपुर, नाशिक-७.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती, व्यशि-२ कार्यासन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.